**मागणी क्र. झेड. ए.०२, २२३० कामगार व सेवायोजन (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण, (०२) (०१) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण (अनिवार्य २२३०ए०३१ (योजनेत्तर) लेखाशिर्षाकरीता सन २०२१-२२ च्या सुधारित अंदाजामध्ये (०६) दूरध्वनी,वीज व पाणी या उद्दिष्टाअंतर्गत रू. ०४,७०,४९,०००/- इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: पुरमा/२०२२/प्र.क्र.७०/व्यशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२२.

**संदर्भ:-** १. संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे क्र.१५/प्रशासकीय मंजुरी/२०२२/५५, दि.२४.०३.२०२२
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वियप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२, दि.१७.०४.२०१५

**प्रस्तावना :**

सन २०२१-२२ मागणी क्र. झेड. ए.०२, २२३० कामगार व सेवायोजन (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण, (०२) (०१) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण (अनिवार्य २२३०ए०३१ (योजनेत्तर) या लेखाशिर्षाकरीता सन २०२१-२२ च्या सुधारित अंदाजामध्ये (०६) दूरध्वनी,वीज व पाणी या उद्दिष्टाअंतर्गत सुधारित अंदाज नुसार रु. २४,९३,०२,०००/- इतका निधी अर्थसंकल्पित होऊन मंजूर झालेला आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रु.१५,००,००,०००/- इतका निधी अर्थसंकल्पित झाला होता, परंतु सुधारित अंदाजात रु.७,५०,००,०००/- इतकी तरतूद प्रत्यक्ष मंजूर होऊन प्राप्त झाली. त्यामुळे सन २०२०-२१ मधील रू. ०४,७०,४९,०००/- (रूपये चार कोटी सत्तर लक्ष एकोणपन्नास हजार फक्त) विद्युतदेयके अपु-या तरतुदीमुळे प्रदान करावयाची प्रलंबित राहिली होती.

२. सन २०२१-२२ या वर्षात उपरोक्त प्रमाणे सुधारित अंदाजात रु. २४,९३,०२,०००/- इतका निधी अर्थसंकल्पित होऊन प्राप्त झाला असून सन २०२०-२१ मधील प्रलंबित विद्युत देयके (०६) दूरध्वनी,वीज व पाणी या उद्दिष्टाकरिता रू. ०४,७०,४९,०००/- इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

सन २०२१-२२ मागणी क्र. झेड. ए.०२, २२३० कामगार व सेवायोजन (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण, (०२) (०१) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण (अनिवार्य २२३०ए०३१ (योजनेत्तर) या लेखाशिर्षाअंतर्गत (०६) दूरध्वनी,वीज व पाणी या उद्दिष्टाकरिता सुधारित अंदाजात रु. २४,९३,०२,०००/- इतका निधी अर्थसंकल्पित झाला असून प्राप्त अनुदानातुन (०६) दूरध्वनी,वीज व पाणी या उद्दिष्टाकरिता रू. ०४,७०,४९,०००/- इतक्या रकमेच्या खर्चास संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी खालील प्रमाणे सादर केलेल्या अटींनुसार या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. अ) सदर दाव्याची योग्य ती तपासणी व पडताळणी करून प्रस्ताव सादर केला आहे.

ब) महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड एक मधील नियम १५१ (१) खालील टीप-२ मध्ये विहित केल्यानुसार माहिती सादर करण्यात आली आहे.

क) मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील नियम ३९ आणि महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम १५१ अनुसार लागू असलेल्या तरतूदीचे अनुपालन करण्यात आलेले आहे.

ड) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ दि. १७.०४.२०१५ मधील भाग पहिला उपविभाग-१ अनुक्रमांक-६, नियम क्र.४० नुसार अन्वेषण प्रमाणपत्र सादर केलेले आहे. ते साक्षांकित करण्यात आलेले आहे.

३. यावर येणारा खर्च मागणी क्र. झेड. ए-०२, २२३० कामगार व सेवायोजन (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण, (०२) (०१) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण (अनिवार्य) २२३०ए०३१ (योजनेत्तर) (०६) दूरध्वनी,वीज व पाणी या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून मंजूर असलेल्या अनुदानातून सदरचा खर्च भागविण्यात यावा.

४. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२, दि.१७.०४.२०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला उपविभाग-एक मधील अनुक्रमांक-६, नियम क्र.४० अन्वये प्रशासकीय विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णय मा. प्रधान सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१२००३९२२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. NAMDEO KONDIBA BHOSALE

Digitally signed by DR. NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, cn=DR. NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2022.03.29 12:03:25 +05'30'

**(डॉ.ना.कों.भोसले)**
**महाराष्ट्र शासनाचे उपसचिव**

**प्रत:**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय.
३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालये.
४. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखाधिकारी, व लेखा परिक्षक मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. निवडनस्ती (व्यशि-४)